सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील पदांचा सुधारीत आकृतिबंध निश्चित करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सववि-३३.२२/प्र.क्र.४९३/आस्था-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : सववि-३३.०९/ प्र.क्र.१५९/आस्था-१, दि.२९.१२.२०११.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : सववि-३३.१४/ प्र.क्र.३५७/आस्था-१, दि.२८.०८.२०१४.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१, दि.१४.०१.२०१६.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : सववि-१०.१६/ प्र.क्र.४६३/आस्था-१, दि.०६.१२.२०१६.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आपुक, दि.२९.०६.२०१७.
६. वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०२३/प्र.क्र.१३/आपुक, दि.१०.०४.२०२३ सोबतचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०६.०३.२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक २९.१२.२०११ च्या शासन निर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभाग, मंत्रालय, मुंबई मधील संवर्गनिहाय एकूण २२२ पदांचा आकृतिबंध निश्चित करण्यात आला होता. तद्नंतर मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१७.०२.२०१४ रोजी झालेल्या उच्चस्तरीय समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या वस्त्रोद्योग धोरणाच्या अंमलबजावणीसाठी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर दि.०८.०५.२०१४ च्या शासन निर्णयानुसार ०४ नवीन पदांची निर्मिती करण्यात आली. त्यानुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागाच्या आस्थापनेवर दि.२८.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एकूण २२६ पदांचा सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्यात आला. त्यानंतर संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०१.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील निर्देशानुसार गट-ड संवर्गातील मंजूर पदांच्या २५% पदे निरसित करण्याच्या अनुषंगाने सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागाच्या आस्थापनेवरील गट-ड मधील नाईक संवर्गातील ०२, शिपाई संवर्गातील ०५ आणि सफाईगार संवर्गातील ०१ अशी एकूण ०८ पदे संदर्भाधीन क्र.४ येथील दि.०६.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये निरसित करण्यात आली. अशा रितीने वित्त विभागाच्या पदांच्या आढाव्याच्या सुचनांनुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागाच्या आस्थापनेवर एकूण २१८ पदे मंजूर होती.

वित्त विभागाने संदर्भ क्र.५ येथील दि.२९.०६.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागातील पदांचा आढवा घेऊन सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार विभागाने २१८ पदांचा सुधारीत आकृतिबंध वित्त विभागामार्फत गठीत उच्चस्तरीय सचिव समितीपुढे मान्यतेसाठी सादर

केला असता उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या सन २०२३ मधील पहिल्या बैठकीतील निर्णयानुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागाच्या नियमित १९२ पदे व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या २१ मनुष्यबळ सेवा याप्रमाणे सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली. सदर सुधारीत आकृतिबंधाचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वरील बाबींचा विचार करुन या शासन निर्णयान्वये खालील प्रपत्र "अ", "ब" व "क" मध्ये दर्शविल्यानुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागामधील एकूण १९२ नियमित पदांच्या व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या २१ मनुष्यबळ सेवा अशा सुधारीत आकृतिबंधास मान्यता देण्यात येत आहे.

**प्रपत्र "अ"**

**नियमित पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनस्तर (सातव्या वेतन आयोगानुसार) | मंजूर पदे |
|---|---|---|---|
| १. | अ.मु.स. / प्र.स. / सचिव | संवर्ग पद | ०२ |
| २. | सह सचिव / उप सचिव | एस-२७ : १२३१००-२१५९००<br>एस-२५ : ७८८००-२०९२०० | ०६ |
| ३. | अपर निबंधक-नि-सह सचिव | एस-२७ : १२३१००-२१५९०० | ०१ |
| ४. | अवर सचिव | एस-२३ : ६७७००-२०८७०० | ०८ |
| ५. | अवर सचिव (विधी) | एस-२३ : ६७७००-२०८७०० | ०१ |
| ६. | कक्ष अधिकारी | एस-१७ : ४७६००-१५११००<br>एस-२० : ५६१००-१७७५०० (चार वर्षाची अखंड सेवा) | २३ |
| ७. | सहायक कक्ष अधिकारी | एस-१४ : ३८६००-१२२८०० | ४८ |
| ८. | सहायक लेखा अधिकारी | एस-१५ : ४१८००-१३२३०० | ०३ |
| ९. | वरिष्ठ स्वीय सहायक | एस-२४ : ७११००-२११९०० | ०१ |
| १०. | निवडश्रेणी लघुलेखक | एस-१७ : ४७६००-१५११०० | ०२ |
| ११. | उच्चश्रेणी लघुलेखक | एस-१६ : ४४९००-१४२४०० | ०६ |
| १२. | निम्नश्रेणी लघुलेखक | एस-१५ : ४१८००-१३२३०० | १२ |
| १३. | लघुटंकलेखक | एस-८ : २५५००-८११०० | ०३ |
| १४. | लिपिक/ लिपिक-टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | ७६ |
| | | **एकूण** | **१९२** |

**प्रपत्र "ब"**

**मृत संवर्गातील पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनस्तर | मंजूर पदे | सध्या कार्यरत असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १. | वाहनचालक | एस-६ : १९९००-६३२०० | ०३ | ०१ |
| २. | नाईक | एस-३ : १६६००-५२४०० | ०५ | ०५ |
| ३. | शिपाई | एस-१ : १५०००-४७६०० | १८ | ०४ |
| | | **एकूण** | **२६** | **१०** |

**प्रपत्र "क"**

**बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा**

| अ.क्र. | पदनाम | |
|---|---|---|
| १. | वाहनचालक | ०३ |

| | | |
|---|---|---|
| २. | बहुउद्देशीय गट “ड” कर्मचारी | १८ |
| | **एकूण** | **२१** |

२. उपरोक्त प्रपत्र “अ” मधील अ.क्र.३ येथील अपर निबंधक-नि-सह सचिव हे ०१ पद विभागातील मंजूर सह सचिव/उप सचिव पदांमधून रुपांतरीत करण्यात येत आहे. सदर पद हे क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांची उपलब्धता व आवश्यकतेनुसार वेळोवेळी सह निबंधक या अवर सचिव दर्जाच्या पदात तात्पुरते श्रेणी अवनत करुन भरण्यात येईल.

३. प्रपत्र “अ” मधील अ.क्र.५ येथील अवर सचिव (विधी) हे ०१ पद विभागातील मंजूर अवर सचिव पदांमधून रुपांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रपत्र “अ” मधील अ.क्र.१० येथील निवडश्रेणी लघुलेखकांची ०२ पदे विभागातील मंजूर उच्चश्रेणी लघुलेखक या पदांमधून रुपांतरीत करण्यात येत आहेत.

५. प्रपत्र “ब” मधील वाहनचालक, नाईक आणि शिपाई हा संवर्ग मृत ठरविण्यात आला असल्याने, सदर पदावर कार्यरत व्यक्तींच्या पदोन्नती /सेवानिवृत्ती/ राजीनामा/ मृत्यू व अन्य कोणत्याही कारणामुळे पद रिक्त झाल्यानंतर ते पद आपोआप रद्द होईल.

६. प्रपत्र “ब” मधील मृत संवर्गात सध्या कार्यरत असलेली पदे, सदर पदावर कार्यरत व्यक्तींच्या पदोन्नती /सेवानिवृत्ती/ राजीनामा/ मृत्यू व अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाल्यानंतर ते पद प्रपत्र “क” मध्ये दर्शविलेल्या मुनष्यबळसंख्येच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेकडून घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३४७/आपुक, दि.२६.०६.२०२३ नुसार मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक क्र. २०२३०७०४१२५२२७९४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANTOSH PUNAMCHAND KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2023.07.04 12:54:12 +05'30'

**(सं.पु.खोरगडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२. मा.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे.
८. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/विकाअ/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उप सचिव/अवर सचिव (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. स्वीय सहायक, अ.मु.स. (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. स्वीय सहायक, सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (रोखशाखा)/(आस्था-२), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (आस्था-१)